सहकारी साखर कारखान्यांचे सन-२०२२-२३ साठी सतत व समवर्ती लेखापरिक्षण करण्यासाठी लेखा परिक्षण कार्यालयातील २४८ अस्थायी पदे सन-२०२२-२३ साठी पुढे चालू ठेवण्याबाबत.
दिनांक ०१/०३/२०२२ ते दिनांक ३१/०८/२०२२.

महाराष्ट्र शासन
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
शासन निर्णय क्रमांक :- ससाका-२०२२/प्र.क्र. ६८ /२५-स,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- ०८ /०३/२०२२.

वाचा:-

१.शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.राजस-१००८/प्र.क्र.५३८/५-स, दि.०५/०५/२०११.
२. शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.ससाका २०२२/प्र.क्र.९९/२५-स, दि.१६.०९.२०२१.
३. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था जा.क्र.आस्थापना/ कक्ष-४/साखर कारखाना/ मुदतवाढ/२०२२/१३२, दिनांक ०४.०२.२०२२.
४. शासन निर्णय वित्त विभाग, क्रमांक :- पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दि.२२.०२.२०२२.

प्रस्तावना :-

उपरोक्त वाचा क्र.२ येथील दिनांक १६/०९/२०२१ च्या शासन निर्णयान्वये सहकारी साखर कारखान्यांचे सतत व समवर्ती लेखा परिक्षण करण्यासाठी निर्माण करण्यात आलेल्या २४८ अस्थायी पदांना दिनांक ०१/०९/२०२१ ते दिनांक २८/०२/२०२२ पर्यंत चालू ठेवण्यास शासनाने मान्यता दिली होती. आता सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, पुणे या कार्यालयाने संदर्भाधीन वाचा क्र. ३ येथील पत्रान्वये सदर २४८पदे दिनांक ०१/०३/२०२२ पासून पुढे चालू ठेवण्यास मंजूरी देणेबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. त्यानुसार सद्य:स्थितीत सदर एकूण २४८ अस्थायी पदे दिनांक ०१/०३/२०२२ पासून दिनांक ३१/०८/२०२२ पर्यंत चालू ठेवण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय :-

उपरोक्त वाचा क्र.२ येथील दिनांक १६/०९/२०२१ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्रातील सहकारी साखर कारखान्यांचे सतत व समवर्ती लेखापरिक्षण करण्यासाठी निर्माण करण्यात आलेली एकूण २४८ अस्थायी पदे दिनांक ०१/०९/२०२१ पासून दिनांक २८/०२/२०२२ पर्यत चालू ठेवण्यास शासनाने मान्यता दिली होती. आता सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे उपरोक्त वाचा क्र. ३ येथील दिनांक ०४/०२/२०२२ च्या पत्रान्वये प्राप्त झालेल्या प्रस्तावातील खाली नमूद एकूण २४८ अस्थायी पदांना दिनांक ०१/०३/२०२२ पासून दिनांक ३१/०८/२०२२ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे. दरम्यान काळात कार्यासन (आस्था-१) आणि कार्यासन (५-स) या कार्यासनांनी कोणत्याही परिस्थितीत त्यांच्या आस्थापनेवरील व त्यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील कार्यालयांच्या आस्थापनेवरील मंजूर पदांना आढावा घेऊन, सुधारित आकृतिबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्याता घेणे आवश्यक आहे. यांनतर सुधारित आकृतीबंध निश्चित करण्याकरीता कालावधी वाढवून देण्यात येणार नाही यांची नोंद घ्यावी. कार्यासन (आस्था-१) आणि कार्यासन (५-स) यांनी प्रशासकीय विभागाच्या (खुद्द) आस्थापनेवरील पदांचा तसेच, त्यांच्या नियंत्रणाखालील क्षेत्रीय कार्यालयाच्या आस्थापनेवरील पदांचा आढावा घेऊन, सुधारित आकृतीबंधाचा प्रस्ताव तातडीने वित्त विभागास सादर करण्याचे नियोजन करून त्वरीत कार्यावाही करावी व सुधारित आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेण्याची दक्षता घ्यावी.

| अ. क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | एकूण पदे |
|---|---|---|---|
| १. | विशेष लेखापरिक्षक, वर्ग-१ | एस २०-५६१००-१७७५०० | ३१ |
| २. | लेखा परिक्षक, श्रेणी-१ | एस १४-३८६००-१२२८०० | ७० |
| ३. | लेखा परिक्षक, श्रेणी-२ | एस १३-३५४००-११२४०० | ६० |
| ४. | उप लेखा परिक्षक | एस ८-२५५००-८११०० | १२ |
| ५. | कनष्ठि लिपिक | एस ६-१९९००-६३२०० | ४३ |
| ६. | लघुटंकलेखक | एस ८-२५५००-८११०० | ०२ |
| ७. | शिपाई | एस १-१५०००-४७६०० | ३० |
| एकूण | | | २४८ |

२. यावरील खर्च मागणी क्रमांक "व्ही-२, २४२५, सहकार-१०१, सहकारी संस्थाची लेखापरिक्षा (०१) (०१) लेखापरिक्षणासाठी कर्मचारी वर्ग (२४२५ ०२२७) या लेखाशीर्षाखाली खर्ची दाखविण्यात यावा व सन २०२२-२३ या वित्तीय वर्षाकरीता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हे आदेश वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दि.२२ फेब्रुवारी, २०२२ अन्वये विभागास प्राप्त प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२२०३०८१७४५३३९१०२ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Pramod Mankoji Valanj

Digitally signed by Pramod Mankoji Valanj
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-operation Markerting And Textiles Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e9e7fafe78ccbad1148295b75b2b4a0fc30e01ea267cb61e5d741e2bf211f323, serialNumber=e3201d81f1fe894c5b90177e9d94ac2f3ea71a180d71893c72721e9ddef50210, cn=Pramod Mankoji Valanj
Date: 2022.03.08 17:48:14 +05'30'

**(प्रमोद वळंज)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१.सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.५ प्रती)
२. साखर आयुक्त, साखर संकुल, शिवाजीनगर, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)
३. जिल्हा कोषागार अधिकारी, यवतमाळ वर्धा, नागपूर सांगली, औरंगाबाद, सोलापूर, पुणे, कोल्हापूर, उस्मानाबाद, अमरावती, अहमदनगर, नाशिक, सातारा, बुलढाणा, नांदेड, लातूर, धुळे, जळगाव,जालना, परभणी, बीड, अकोला.
४. जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था यवतमाळ वर्धा, नागपूर सांगली, औरंगाबाद, सोलापूर, पुणे, कोल्हापूर, उस्मानाबाद, अमरावती, अहमदनगर, नाशिक, सातारा, बुलढाणा, नांदेड, लातूर, धुळे,जळगाव, जालना, परभणी, बीड, अकोला.
५. विभागीय सहनिबंधक सहकारी संस्था (लेखापरिक्षण), कोकण विभाग, मुंबई, पुणे, नागपूर, औरंगबाद, नाशिक, अमरावती.
६. प्रादेशिक सहसंचालक (साखर) अहमदनगर, औरंगाबाद, नागपूर, नांदेड, कोल्हापूर, पुणे, अमरावती,सोलापूर.
७. अपर निबंधक सहकारी संस्था (लेखापरिक्षण) महाराष्ट्र राज्य,पुणे-१.
८.महालेखापाल-१, (लेखापरिक्षण), महाराष्ट्र राज्य, महर्षि कर्वे मार्ग, मुंबई.

९. वित्त विभाग (विसू-१)(व्यय-२)/(अर्थसंकल्प-१९)/(आ.पु.क.),मंत्रालय, मुंबई.
१०. सर्व अधिकारी/कार्यासने, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.उप सचिव (का.५-स)/(आस्था-१), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.निवड नस्ती-२५-स संग्रहार्थ.